बंदरापर्यंत रोड/रेल्वे मार्ग बांधणे आणि ब्रेकवॉटर (पश्चजल) विकास (३०५१ ०७६८) या योजनेसाठी सन २०१८-१९ मध्ये अर्थसंकल्पीत निधीपैकी रू.६.५८ कोटी इतका निधी खर्च करण्यास मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीजीटी ०८१८/प्र.क्र.१४३/बंदरे-२**
**गृह विभाग, मंत्रालय**
**मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- ०१ फेब्रुवारी, २०१९**

**संदर्भ:-** १. महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाचे पत्र क्र.ममेबो/मुकाअ/अभि/निधी वितरण प्रस्ताव/२०१८-१९/४५४ दि.१४.०८.२०१८,
२. महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाचे पत्र क्र.ममेबो/लेखा/अर्थ/उपयोगीता प्रमाणपत्र/६६३ दि.२४.०१.२०१९

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून राबविण्यात येणाऱ्या "बंदरापर्यंत रोड/रेल्वे मार्ग बांधणे आणि ब्रेकवॉटर (पश्चजल) विकास" या योजनेकरीता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षामध्ये अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु.१०.०० कोटी इतक्या रकमेपैकी रु.६.५८ कोटी (रुपये सहा कोटी अठ्ठावण्ण लक्ष) इतका निधी खालील कामांसाठी खर्च करण्यास मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांना मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | कामाचे नाव | अंदाजपत्रकिय किंमत (रक्कम कोटीत) | सन २०१८-१९ करीता आवश्यक निधी | प्रशासकिय मान्यता |
|---|---|---|---|---|
| १ | वरवडे, ता.जि.रत्नागिरी येथील कस्टम हाऊस ते दिपस्तंभा जवळील रस्त्याचे डांबरीकरण व मजबुतीकरण करणे | २.५८ कोटी | २.५८ कोटी | प्रशासकिय मान्यता प्राप्त |
| २ | आगरदांडा, ता.मुरूड, जि.रायगड येथे रो-रो जेट्टीकरीता जोडरस्ता तयार कऱणे | ८.०० कोटी | ४.०० कोटी | प्रशासकिय मान्यता प्राप्त |
| | **एकुण** | **१०.५८ कोटी** | **६.५८ कोटी** | |

२. सदर निधी नियमाप्रमाणे खर्च करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांची राहील.

३. यासाठी होणारा खर्च "मागणी क्र. बी-७, लेखाशीर्ष क्र. ३०५१- बंदरे व दिपगृहे, (८०) सर्वसाधारण, (१९०), सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना सहाय्य, (०१) सागरी मंडळास (मेरीटाईम बोर्डास) सहायक अनुदान, (०१)(०८) बंदरापर्यंत रस्ते/रेल्वे मार्ग बांधणे आणि बॅकवॉटर (पश्चजल) विकास (योजनांतर्गत) (३०५१ ०७६८)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा.

४. या वितरीत करावयाच्या तरतुदीकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून लेखाधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड हे राहतील.

५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या दि.०२.०४.२०१८ च्या शासन परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.८ मधील १ ते १० अटींची पूर्तता होत असल्याची खात्री करण्यात आली आहे. यापूर्वी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास अदा करण्यात आलेल्या रू.१९.२० कोटी निधीपैकी रू.१५.९३ कोटी निधी खर्च केल्याचे उपयोगीता प्रमाणपत्र संदर्भाधीन दि.२४.०१.२०१९ च्या पत्रान्वये महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने सादर केलेले आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१९०२०२१५३८०१९५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Hanmanlu Damayyawar

Digitally signed by Ashok Hanmanlu Damayyawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2bd0dc6138e4f3c9997616b47f0dc918cd4715f466afd0623c843397ffc06a09, serialNumber=2cc45c1c1345a8b6ff1e9fdbd2d12c6527f6d070c05b708bcc57b79b7ef3a95d, cn=Ashok Hanmanlu Damayyawar
Date: 2019.02.02 15:39:29 +05'30'

**( अ. ह. दमय्यावार )**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.
२) वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई-३२.
३) नियोजन विभाग (का. १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
४) प्रधान सचिव (बंदरे), गृह विभाग.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८) कार्यासन अधिकारी, बीयुडी-१, गृह विभाग.
९) निवडनस्ती (बंदरे-२)